**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र. कअनि-११२५/प्र.क्र.०६/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २० फेब्रुवारी, २०२५

पहा : आदिवासी विकास विभाग, कार्यालयीन आदेश क्र.आस्था-२०२५/प्र.क्र.१४/का.१, दि.१७.०१.२०२५

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) अनुसार खाली नमूद केलेल्या मंत्रालयीन विभागातील कक्ष अधिकाऱ्यांची प्रशासकीय कारणास्तव आंतरविभागीय बदली करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोरील स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागात त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | श्री. / श्रीमती | कक्ष अधिकाऱ्याचे नांव | सध्याचा विभाग | बदलीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १) | श्री. | ललितकुमार धायगुडे | आदिवासी विकास विभाग | विधि व न्याय विभाग |

२. श्री.धायगुडे यांनी बदली झालेल्या तात्काळ विभागात रुजू व्हावे.

३. श्री. ललितकुमार धायगुडे, कक्ष अधिकारी यांना आदिवासी विकास विभागाने दिनांक १७.०१.२०२५ (म.नं.) पासून परस्पर कार्यमुक्त केले असल्याने, श्री.धायगुडे, कक्ष अधिकारी यांचा दिनांक १८.०१.२०२५ ते आदेशाच्या दिनांकापर्यंतचा कालावधी प्रशासकीय कारणास्तव **"सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी"** म्हणून मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सक्तीचा प्रतिक्षाधीन कालावधी मंजूर करण्याची कार्यवाही म.ना.से. (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ च्या नियम ९ (१४) (एफ) नुसार व वित्त विभाग, शासन निर्णय, दिनांक ०२.०६.२००३ मधील तरतुदीनुसार विधि व न्याय विभागाने करावी.

४. विधि व न्याय विभागाने सदर कक्ष अधिकारी विभागात रुजू झाल्याबाबतची माहिती साप्रवि/प्रशा-२ (१४ब) कार्यासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२०१८२५५७४००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN SAHADEO PARAB
Date: 2025.02.20 18:29:44 +05'30'

**( ग. स. परब )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.ललितकुमार धायगुडे, कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

....(संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१) प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
२) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सह(आस्थापना) उप सचिव/, विधि व न्याय विभाग आणि आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
४) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, ठाकरसी हाऊस, बॅलार्ड पिअर, सुरजी वल्लभदास रोड, मुंबई
५) आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) निवड नस्ती/प्रशा-२(१४ब)